**उपनिबंधक, सहकारी संस्था,गट-अ या संवर्गातील नियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस-२०१५/प्र.क्र.२३/५-स**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १३ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्र. राजस-१०१३/प्र.क्र.१३४/५-स,दि.१०/५/२०१३
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे आदेश क्र. अर्थ/वलिच/नाशिक जिमस/१२१०/प्रशा नि./१३, दिनांक ०२/०७/२०१३.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., नाशिक यांचे पत्र क्र. शासन/आस्थापना/९७९/दिनांक ०२/०७/२०१३
४) शासन पत्र क्र. राजस १०१३/प्र.क्र.२५९/५-स, दि. १२/०८/२०१३.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आस्थापना /कक्ष-२/अ-१ /बीव्हीएस/प्र./२०१५, दि. १५/०१/२०१५

**प्रस्तावना-**

श्री. बी. व्ही. शिंदे, उपनिबंधक, सहकारी संस्था, यांची संदर्भाधिन क्र.१ येथिल दि. १०/०५/२०१३ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नाशिक या पदावरुन बदली करण्यांत आली. श्री. शिंदे हे सदर पदावरुन दि. १४/०५/२०१३ रोजी म. पू. कार्यमुक्त झाले. त्यामुळे श्री. शिंदे हे दि. १४/०५/२०१३ पासून नियुक्तीच्या प्रतिक्षेत होते. दरम्यानच्या कालावधीत संदर्भाधिन क्र. २ येथिल दि. ०२/०७/२०१३ च्या सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, यांच्या आदेशान्वये त्यांची प्रशासकीय मंडळ सदस्य, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., नाशिक या पदावर नियुक्ती करण्यात आली. श्री. शिंदे यांनी दि. ०२/०७/२०१३ रोजी मध्यांन्होत्तर नियुक्तीच्या पदाचा कार्यभार स्विकारला आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन,बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधिल तरतूदीनुसार श्री. शिंदे उपनिबंधक, सहकारी संस्था, तथा प्रशासक मंडळ सदस्य, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या, नाशिक या पदावरील प्रतिनियुक्तीने नेमणूकीचे आदेश शासन स्तरावरुन निर्गमित करणे आवश्यक असल्याने संदर्भाधिन क्र.५ येथील पत्रान्वये सहकार आयुक्तांनी प्रस्ताव सादर केला असून श्री.शिंदे यांच्या प्रतिनियुक्तीच्या आदेशास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४(४) मधील तरतूदीनुसार सहकार खात्यातील खाली नमुद केलेल्या उपनिबंधक, सहकारी संस्था गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव त्यांचे नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी दि.२.७.२०१३ पासून प्रतिनियुक्तीने नेमणूक करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिका-यांचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे ठिकाण व पद |
|---|---|---|
| १ | श्री. बी. व्ही. शिंदे, उपनिबंधक, सहकारी संस्था | उपनिबंधक, सहकारी संस्था, तथा प्रशासक मंडळ सदस्य, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. नाशिक |

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१३१८०२४१३३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang S Deokar

Digitally signed by Pandurang S Deokar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandurang S Deokar
Date: 2015.02.13 18:12:29 +05'30'

**पां.स. देवकर**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) संचालक, साखर महाराष्ट्र राज्य, पुणे
३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रो्द्योग संचालनालय, नागपूर
५) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन/लेखापरीक्षण)
६) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
७) सर्व जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था
८) प्रशासक, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि. नाशिक,
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
११) संबधित अधिकारी द्वारा, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, म. रा. पूणे
१२) खाजगी सचिव, मा. मंत्री (सहकार)
१३) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (सहकार)/ मा. राज्यमंत्री (पणन)/ मा. राज्यमंत्री (वस्त्रोद्योग)
१४) अपर मुख्य सचिव (कृषि)/अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग)/प्रधान सचिव, (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक
१५) सर्व सहसचिव/ उप सचिव/अवर सचिव/सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती ५-स कार्यासन